औरंगाबाद शहरात उस्मानपुरा येथे नविन पोलीस ठाणे निर्माण करणे.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग.
शासन निर्णय क्र. पीओएस-०१०२/७२३/प्र.क्र.२/पोल-३
मंत्रालय,मुंबई-४०००३२, दिनांक ९.४.२००३

वाचा :- १) पोलीस महासंचालक यांचे पत्र क्र.पोमसं-२६/४७/औ.शहर/उस्मानपुरा /२००१ दिनांक २१.३.२०२
२) पोलीस आयुक्त औरंगाबाद यांचे पत्र क्र.कक्ष-२/जवाहरनगर/वि/२००२/४१८ दिनांक ८.५.२००२

प्रस्तावना:- औरंगाबाद शहराची औद्योगिक व शैक्षणिक क्षेत्रांत तसेच लोकसंख्येत झपाट्याने वाढ होत असून औद्योगिक वाढीमुळे कामगारांच्या चळवळीत वाढ होवून कायदा व सुव्यवस्था तसेच गुन्हेगारीचे दृष्टीने पोलीसांना जटील समस्यांना नेहमीच तोंड दयावे लागते एखाद्या क्षुल्लक जातीय घटनेस गंभीर वळण देवून कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न निर्माण होतो. देशाच्या कोणत्याही भागात घटना घडल्यास त्याची प्रतिक्रिया या शहरात लागलीच उमटतात. या शहरात कट्टर जातीयवादी संघटना सक्रिय आहेत. त्यांचे हालचालीवर प्रभावीपणे नियंत्रण ठेवणे आवश्यक आहे.औरंगाबाद शहरातील सर्व सामाजिक आणि राजकिय नेत्यांनी पिरबाजार (उस्मानपुरा) येथे नविन पोलीस ठाणे निर्माण करणेबाबत मागणी केली आहे.तसेच उस्मानपुरा भागातील रहिवाशांची सुध्दा पुर्वी पासूनची मागणी आहे. औरंगाबाद शहरातील उस्मानपुरा येथे पोलीस ठाणे निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.या संदर्भात शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :- औरंगाबाद शहरातील जवाहरनगर पोलीस ठाणे, छावणी पोलीस ठाणे व क्रांतीचौक पोलीस ठाणेचे विभाजन करून उस्मानपुरा पोलीस ठाणे निर्माण करण्यास शासन मान्यता देत आहे.नियोजित उस्मानपुरा पोलीस ठाणे करिता जवाहरनगर,छावणी व क्रांतीचौक या मूळ पोलीस ठाणेमधून खाली दर्शविल्याप्रमाणे एकूण ५७ पदे वर्ग करून उपलब्ध करून देण्यात येत आहे.

| | पोलीस नि | स.पो.नि./ पो.उप.नि | पो/हवा. | पो.ना./ पो.शि. | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| जवाहर नगर पोलीस ठाणे - | १ | १ | ६ | २० | २८ |
| क्रांतीचौक पोलीस ठाणे | - | १ | ६ | १७ | २४ |
| छावणी पोलीस ठाणे | - | - | - | ५ | ५ |
| | १ | २ | १२ | ४२ | ५७ |

नियोजित उस्मानपुरा पोलीस ठाणे करिता साधनसामुग्री वाहन व इतर अनुषंगिक कार्यालयीन साहित्य पोलीस आयुक्त औरंगाबाद यांनी अंतर्गत व्यवस्थेने उपलब्ध करुन देण्यात यावे.नविन दूरध्वनी वरिल खर्च सन २००३-२००४ च्या मंजूर अनुदानातून भागवण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारिक संदर्भ सीआर १८६/व्यय-७, दि.१७.२.२००३ अन्वये काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सु. ज. महाजन)
सह सचिव,महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रति,
१) पोलीस महासंचालक व पोलीस महानिरीक्षक,
२) विशेष पोलीस महानिरीक्षक,औरंगाबाद परिक्षेत्र.
३) पोलीस आयुक्त,औरंगाबाद.
४) प्रधान महालेखाकार (लेखा परीक्षा )मुंबई.
५) महालेखापाल महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा /लेखा अनुज्ञेयता)नागपूर.
६) जिल्हा कोषागार अधिकारी ,औरंगाबाद.
७) वित्त विभाग (व्यय-७) मंत्रालय,मुंबई-३२.
८) गृह विभाग कार्यासन -बियुडी-१, पोल-७
९) पोल-३, निवड नस्ती.